लोकमत

# छत्रपती शिवाजी महाराजांची बसरूर मोहीम : एक विलक्षण घटना

३५७ वर्षांपूर्वी म्हणजेच ८ फेब्रुवारी १६६५ रोजी एक राजा सिंधुबंदी व अन्य धार्मिक चालीरीती झुगारून देऊन, स्वतः सैन्याचे नेतृत्व करुन दोन बलाढ्य देशांच्या पलीकडील राज्यावर आरमारी मोहीम काढतो ही भारताच्या समुद्री इतिहासातील विलक्षण घटना आहे.

लढाऊ आरमार बाळगण्याची पोर्तुगीज-इंग्रज-फ्रेंच-डच यांच्याशिवाय अन्य कोणासही परवानगी नसताना, साधनसामुग्री व तंत्रज्ञानाची कमतरता असताना आणि समुद्री लढाईची कोणतीही पिढीजात परंपरा नसतानाही छत्रपती शिवाजी महाराजांनी २४ ऑक्टोबर १६५७ रोजी कल्याण-भिवंडी काबीज करून तेथे मराठा आरमाराची मुहूर्तमेढ रोवली. या विलक्षण घटनेनंतर अवघ्या ८ वर्षामध्ये समुद्रावरील प्रबळ अशा पोर्तुगीज व डचांच्या विरोधात तसेच कर्नाटक प्रांतातील प्रबळ आदिलशाही सत्तेविरोधात शिवरायांनी आरमारी मोहीम काढली. आपल्या आरमारी अधिकाऱ्यांना व सेनेला पाठवून त्यांनी हि मोहीम पूर्ण केली असती. मात्र एवढी मोठी जोखीम पत्करून शिवरायांनी हि मोहीम काढली व शत्रूने कोणतीही हालचाल करायच्या आत ती पूर्ण देखील केली. गोव्याचे पोर्तुगीज आपले सैन्य घेऊन मुंबई बेट इंग्रजांना हस्तांतरित करण्यासाठी जाणार होते. ती तारीख हेरांकरवी महाराजांना कळली आणि तात्काळ महाराजांनी मोहिमेची तारीख निश्चित केली आणि ती होती - ८ फेब्रुवारी १६६१. ३ मोठी व ८५ छोटी जहाजे, दर्यावर्दी लोक आणि मुबलक पाणी व शिधासामुग्री सोबत घेऊन महाराज मालोंड या बंदरावरुन मोहिमेस निघाले. कानडी मुलुखातील प्रमुख बंदरांवर आपले सैनिक अगोदरच गुपचूप रवाना झाले होते. समुद्रकिनाऱ्यालगतच्या गांगोळी येथे आपला आरमारी लवाजमा ठेऊन निवडक जहाजे व लोक घेऊन राजे केळदी राज्यातील 'बसरुर' या बंदरावर पोहोचले. पुढे इतरही काही कानडी मुलुखातील प्रमुख बंदरे ताब्यात घेऊन राजे गोकर्ण येथे आले. येथील प्रसिद्ध श्री महाबळेश्वराचे दर्शन घेऊन महाराज कारवारला आले. आदिलशाहीतील एक सरदार शेरखान अचानक कारवारला आल्यामुळे येथे महाराजांचे २ दिवस गेले.




कारवारवरुन सर्व लुटीचे सामान जहाजांदवारे मालवणला पाठवून राजांनी २४ फेब्रुवारी रोजी कारवार सोडले. आणि कद्रयामार्गे काळी नदी ओलांडून भीमगड, आंबोली घाट मार्गे ते राजगडला आले.

बसरुर या आरमारी मोहिमेचे मोठे पडसाद मराठा व भारतीय समुद्री इतिहासावर पडले. केळदीच्या राजांना शिवरायांनी केलेल्या सहकार्यामुळे पुढे औरंगजेबाचे संकट मराठी मुलखावर आले असताना, छत्रपती राजाराम महाराजांना जिंजीकडे सुखरुप जाण्यासाठी केळदीच्या राणीने सर्वतोपरी मदत केली. समुद्रावर मराठ्यांची सत्ता निर्माण होऊ शकते हा दृढ आत्मविश्वास मराठ्यांच्या मनात या मोहिमेमुळे निर्माण झाला आणि भविष्यात मराठा आरमाराने आपल्या यशाची पताका हिंदी महासागरावर फडकवत ठेवली, ते या मोहिमेचे फलितचं म्हणावे लागेल.



**स्मरण**

**अनिकेत अंकुश यादव**
(लेखक आरमाराचे व इतिहासाचे अभ्यासक आहेत)
aniketyadav84@gmail.com